राष्ट्रीय हिवताप निर्मुलन कार्यक्रमांतर्गत १०२००
हंगामी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हिनिका-२०१५/अपदे/प्र.क्र.२४/आरोग्य-५**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मुंबई-४०० ००१.
तारीख: ४ सप्टेंबर, २०१५

वाचा:-

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः हिनिका/२०१४/अपदे /प्र.क्र.४५/आरोग्य-५, दि. १३/०३/२०१४.**

२) **सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो) पुणे यांचे पत्र क्र. ससंआसे/किजरो/१०२००/ मनुष्यबळ/हंगामी/अस्थाई पदे आस्था-४/ न.क्र.१७०/८९७९, दि.०६/०१/२०१४.**

३) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/किजरो/हंगामी मनुष्यबळ/उपलब्धता/ ८१७९-८०/कक्ष-१८, दि.०५/०८/२०१५.**

**शासन निर्णय:**

राष्ट्रीय हिवताप निर्मुलन कार्यक्रमांतर्गत रुपये ५२००-२०२०० या वेतनश्रेणीमधील १७०० वरिष्ठ क्षेत्र कर्मचारी व रुपये ४४४०-७४४० या वेतनश्रेणीमधील ८५०० क्षेत्र कर्मचारी अशी एकूण १०२०० हंगामी पदे संदर्भ क्र.१ येथील आदेशान्वये दि.०१/०३/२०१४ ते २८/०२/२०१५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यात आली होती. सदरची पदे ही नियमित स्वरुपाची किंवा कंत्राटी स्वरुपाची नसल्याने तसेच त्यांच्या नियुक्तीचा कालावधी निश्चित नाही. सदर हंगामी फवारणी कर्मचाऱ्यांना जून ते ऑक्टोबर मध्ये आवश्यकतेनुसार अथवा इतर कालावधीत आवश्यकतेनुसार तात्पुरत्या हंगामी स्वरुपात नियुक्त्या देण्यात येत असतात. सदर पदे राज्यातील जनतेला आरोग्य विषयक सेवा पुरविण्याच्या दृष्टीने आवश्यक आहेत. यास्तव ही पदे दिनांक ०१/०३/२०१५ ते २९/२/२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर १०२०० हंगामी पदांमार्फत फक्त ३,००,००० च्या मर्यादेतच मनुष्यबळ खर्च करण्यात यावे. या व्यतीरिक्त अधिक मनुष्यबळाची आवश्यकता भासल्यास शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय अधिकचे मनुष्यबळ खर्च करण्यात येऊ नये.

३. राष्ट्रीय हिवताप निर्मुलन कार्यक्रमांतर्गत फवारणी योजनेवर संनियंत्रण राहण्याच्या दृष्टीने प्रत्येक गटात, कमीत कमी कर्मचारी असावेत, तसेच सदर कर्मचाऱ्यांनी औषध फवारणी केल्याबद्दलचा स्थानिक प्राधिकरणाचा दाखला घेण्यात यावा. सदर दाखला सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो), पुणे-६ यांचेकडे सादर करण्यात यावा.

४. या पदावरील खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ च्या मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक आर-१**
**२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य**
**०६-सार्वजनिक आरोग्य**
**१०१-रोग प्रतिबंध व नियंत्रण**
**(०१)(०५) हिवताप निर्मुलन कार्यक्रम**
**सांकेतांक (२२१० ०६११)**

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपाचारिक संदर्भ क्र.४९२/०७/व्यय-१३, दि.०३/११/२००७ अन्वये विभाग प्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०४१११३००२५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayshree Suresh Jadhav

Digitally signed by Jayshree Suresh Jadhav
DN: CN = Jayshree Suresh Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Desk Officer
Date: 2015.09.07 17:24:09 +05'30'

**ज. सु. जाधव**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज. रो) पुणे-६.
३. उपसंचालक आरोग्य सेवा (सर्व).

४. सहायक संचालक, आरोग्य सेवा (सर्व).

५. जिल्हा हिवताप अधिकारी (सर्व)

६. हत्तीरोग अधिकारी नियंत्रण सर्वेक्षण पथके (सर्व) (सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह.व ज.रो.) यांचेमार्फत.

७. वैद्यकीय अधिकारी/हत्तीरोग संशोधन व प्रशिक्षण केंद्र नागपूर.

८. आरोग्य अधिकारी ठाणे/नागपूर महानगरपालिका.

९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, २ (लेखापरिक्षा)/लेखा व अनुज्ञेयता, मुंबई/नागपूर.

१०.वित्त विभाग, व्यय १३ मंत्रालय मुंबई.

१०.निवडनस्ती (आरोग्य-५).